महाराष्ट्र राज्य काजू मंडळासाठी सन २०२४-२५ करीता निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः काजूमं-०९२४/प्र.क्र.१००/२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २८ जून, २०२४.

**वाचा:-**

१) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्र.काविधो-२०२०/प्र.क्र.१७६/९-अे, दि.१६.०२.२०२३.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.कृपमं-०५२३/प्र.क्र.१८०/२१-स, दि.१६.०५.२०२३.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.कृपमं-०५२३/प्र.क्र.१८०/२१-स, दि.०१.०३.२०२४.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं- २०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महा.राज्य काजू मंडळ यांचे पत्र क्र.मराकाजूमं/भाग भांडवल प्रस्ताव/८/२०२४, दि.२९.०४.२०२४.

**प्रस्तावना:-**

कृषी व पदुम विभागाने महाराष्ट्रातील काजूच्या सर्वंकष विकासासाठी काजू फळ पिक विकास योजना लागू करण्यास संदर्भ क्र.१ येथील दि.१६.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरुन संदर्भ क्र.२ येथील दि.१६.०५.२०२३ च्या शासन निर्णयान्वये, राज्यातील काजू फळ पिकाच्या विकासाकरिता “महाराष्ट्र राज्य काजू मंडळ” स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर काजू मंडळ हे काजूच्या Promotional, Processing, Value addition व Marketing या क्षेत्रात काम करणार आहे.

महाराष्ट्र राज्य काजू मंडळासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता भागभांडवलाकरीता अर्थसंकल्पित रु.१२.०० कोटी निधीपैकी रु.२.४० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य काजू मंडळासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता भागभांडवलाकरीता अर्थसंकल्पित रु.१२.०० कोटी निधीपैकी रु.२.४० कोटी (अक्षरी रुपये दोन कोटी चाळीस लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२.      महाराष्ट्र राज्य काजू मंडळासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीत व वितरीत करावयाच्या निधीचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

(रुपये कोटीत)

| संस्थेचे नाव | अर्थसंकल्पित निधी | चालू वर्षी वितरीत निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|
| महाराष्ट्र राज्य काजू मंडळ | १२.०० | ०.०० | २.४० |

३.      सदरहू खर्च "मागणी क्र.व्ही-३, मुख्य लेखाशिर्ष- ४४३५-इतर कृषि विषयक कार्यक्रम यावरील भांडवली खर्च, ०१, पणन व गुणवत्ता नियंत्रण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) काजू फळपिक विकास योजना, (०१)(०१) महाराष्ट्र राज्य काजू मंडळ, (कार्यक्रम) (४४३५ ००८४) ५४, गुंतवणूका" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करीता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीय निधीतून भागविण्यात यावा.

४.      उपरोक्त परिच्छेद क्र.२ येथील तक्त्यात नमूद केलेल्या निधीचे आहरण व वितरण करण्यासाठी श्री.संतोष ज्ञानदेव देशमुख, उप सचिव (पणन) (V००१०), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्री.सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई  यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेला निधी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरीत करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी यांनी करावी.

५.      महाराष्ट्र राज्य काजू मंडळाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी RTGS सुविधेद्वारे मंडळाच्या बँक खात्यावर जमा करावयाचा असून, त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| | |
|---|---|
| Bank Name | State Bank of India, Market Yard, Pune. |
| Account Type | Current account |
| Account No. | 42790358905 |
| IFSC CODE | SBIN0006117 |

६.      या शासन निर्णयाव्दारे उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे, त्याच कारणासाठी विनियोग करण्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य काजू मंडळ यांनी खात्री करावी आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तत्परतेने सादर करावे.

७.      वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०१.०४.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार विहीत केलेल्या अटींची पूर्तता होत असल्याने, सदर परिपत्रकान्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२६६/का.१४३१, दि.०९.०५.२०२४ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३८३/२०२४/व्यय-२, दि.२२.०५.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६२८११५५०००३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADHAVI SANDEEP SHINDE

Digitally signed by MADHAVI SANDEEP SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=020531e249e88fe74bf6db805f42944e7f29bc0ba6134c83c1f183b8cc27f2ff, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4CB1CBBD6A4EE442FDAA6C1B358BF61FEAF9AEFC16E8F39E9EE1D06B9E8A7A59, cn=MADHAVI SANDEEP SHINDE
Date: 2024.06.28 12:06:59 +05'30'

**( माधवी सं.शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य काजू मंडळ, वेंगुर्ला जि.सिंधुदुर्ग.
४. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य -१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य -२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) नागपूर.
६. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. कक्ष अधिकारी/अवर सचिव (व्यय-२/अर्थसंकल्प-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव/कक्ष अधिकारी (१७-स/रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (२१-स).